राज्यात कोवीड-१९ महामारी उपचारासाठी निर्मित कोवीड हेल्थ सेंटर, कोवीड केअर सेंटर, व कोवीड हॉस्पीटल तसेच जम्बो कोवीड सेंटर्स व क्वारंटाईन सेंटर येथे लैंगिक अत्याचार घटना घडल्यास त्याबाबत करावयाची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांकः संकीर्ण २०१४/प्र.क्र.२७०/आरोग्य ३**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २५ सप्टेंबर, २०२०.

**वाचा :**

१. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२७०/आ-३, दि. ०७/०८/२०१५.
२. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२७०/आ-३, दि. १०/०१/२०१९.
३. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.२७०/आ-३, दि. १६/०१/२०२०

**शासन परिपत्रक :**

लैंगिक अत्याचारास बळी पडलेल्या व्यक्तींना तसेच बाल लैंगिक अत्याचार (POSCO) कायद्याची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी वेळोवेळी शासन परिपत्रके निर्गमित करण्यात आलेली आहेत.

२. लैंगिक अत्याचार पिडीत व्यक्तींची तपासणी केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे (शासन परिपत्रक पुस्तिका ०७/०८/२०१५) करण्याबाबत यापूर्वी आपणास सूचित करण्यात आले आहे.

३. सध्या राज्यात कोवीड महामारी (Pandemic)सुरु असून मोठ्या प्रमाणात रुग्ण संख्या असल्याने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या, वैद्यकीय शिक्षण विभाग व स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या रुग्णालया व्यतिरिक्त अनेक स्वतंत्र कोवीड रुग्णालये स्थापित करण्यात आलेली आहेत.

४. राज्यात मागील काही महिन्यात अशा प्रकारच्या कोवीड सेंटर्स मध्ये लैंगिक अत्याचाराच्या, विनयभंगाच्या व बाल लैंगिक अत्याचाराच्या घटना घडल्याबाबतच्या बातम्या वृत्तपत्रातुन प्रसिध्द झाल्या आहेत. या पार्श्वभूमीवर सर्व संबंधित रुग्णालयांसाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.त्या सर्व सूचनांचे व शासन परिपत्रक ०७/०८/२०१५ व शासन परिपत्रक दि. १४/०१/२०१९ चे सर्व संबंधित रुग्णालयांनी कटाक्षाने पालन करावे. यामध्ये कोणताही हलगर्जीपण वा दुर्लक्ष होणार नाही यांची दक्षता घ्यावी. यासंदर्भात पुढील प्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

**मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे :**

१. कोवीड केअर सेंटर (C.C.C), कोवीडहेल्थ केअर सेंटर (DCHC) व डेडीकेटेड कोवीड हॉस्पीटल (D.C.H) तसेच जम्बो कोवीड सेंटर व क्वारंटाईन सेंटर मध्ये अशाप्रकारे लैंगिक अत्याचाराची घटना झाल्याचे निदर्शनास आल्यास पिडीत व्यक्तीची तपासणी त्या सेंटरमध्येच करण्यात यावी. त्यासाठी लागणारे प्रशिक्षीत मनुष्यबळ (स्त्री वैद्यकीय अधिकारी, परिचारिका इ.) नजीकच्या शासकिय / निमशासकिय रुग्णालयातुन मागविण्यात यावे.

२. पिडीत व्यक्तींच्या तपासणीसाठी लागणारा कक्ष कोवीड सेंटमध्ये तयार करण्यात यावा व आवश्यक ते साहित्य कक्षात उपलब्ध राहील याची दक्षता घ्यावी.

३. कोवीड प्रोटोकॉलप्रमाणे योग्यप्रकारे पी.पी.ई कीट वापरुन स्त्री वैद्यकीय अधिकारी द्वारे पिडीत व्यक्तीची तपासणी करावी.

४. सर्व संबंधित तज्ञ मंडळींना याबाबतचे प्रोटोकॉल व SOP (शासन परिपत्रक दि. ०७/०८/२०१५ व शासन परिपत्रक दि. १०/०१/२०१९) निदर्शनास आणून द्यावे.

५. तपासणी पूर्ण झाल्यानंतर पोलिसांकडे द्यावयाचे अहवाल प्रपत्र नमुने इत्यादी सेंटरवर उपलब्ध करुन देण्यात यावेत, किंवा तपासणी करणा-या स्त्री वैद्यकीय अधिकारी व स्टाफ यांनी घेऊन यावे.

६. लैंगिक अत्याचाराची घटना घडल्याचे निदर्शनास आल्यानंतर लवकरात लवकर संपूर्ण तपासणी होऊन योनी-स्वॅब, रक्त नमुने, व इतर सॅम्पल घेण्याची व न्यायवैद्यक प्रयोगशाळेकडे पाठविण्याची कार्यवाही करावी.

७. " सेहत " या स्वंयसेवी संस्थेद्वारे यापूर्वी सर्व स्त्रीरोगतज्ञ व स्त्री वैद्यकीय अधिकारी यांचे २ दिवसांचे प्रशिक्षण घेण्यात आलेले आहे. तरी ज्यांचे प्रशिक्षण पूर्ण झाले आहे, त्याच्यामार्फत अन्यास्त्री वैद्यकीय अधिकारी व स्टाफ यांचे प्रशिक्षण V.C द्वारे घेण्यात यावे.

८. पिडीत व्यक्तीला कोवीड सेंटरमध्ये आवश्यक ती सर्व इतर मदत (कायदेविषयक सल्ला, समुपदेशन , व पोलिस मदत) उपलब्ध करुन द्यावी.

९. उपरोक्त संदर्भ क्र. (३) अन्वये लैंगिक अत्याचारास बळी पडलेल्या व्यक्तींना न्यायवैद्यकीय मदत मिळण्याकरिता मार्गदर्शक सूचनांची राज्यभरात अंमलबजावणी करण्याकरिता डॉ. साधना तायडे, संचालक, आरोग्य सेवा, आयुक्तालय, मुंबई यांना नोडल अधिकारी म्हणुन नेमणूक करण्यात आली आहे. तरी, अशा प्रकारच्या घटना कोवीड महामारीसाठी तयार

करण्यात आलेल्या विशेष रुग्णालये, सेंटरर्स मध्ये घडल्यास त्याबाबतचा अहवाल संचालक आरोग्य सेवा -१, आरोग्य सेवा आयुक्तालय मुंबई येथे त्वरित सादर करावा. (Email : - dhs_२००५@rediffmail.com kind attention सहायक संचालक मुख्यालये)

५. कोवीड सेंटर्समध्ये व रुग्णालयात झालेल्या अशा प्रकारच्या लैगिंक अत्याचाराच्या घटनांबाबतचा अहवाल वेळोवेळी खालील नमुन्यात आरोग्य सेवा आयुक्तालयास सादर करावा.

**१. रुग्णालयाचे / केंद्राचे नाव: -**

**२. कालावधी ( महिना /वर्ष )**

| अक्र. | एमएलसी क्र | वय | लिंग | तपासणीचा दिनांक | नमुने पाठविल्याचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|

तरी उपरोक्त सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याबाबत सर्व संबंधितांना आपल्यास्तावरुन सूचना देण्यात याव्यात. उपसंचालक आरोग्य सेवा (परिमंडळे) यांनी त्यांचे क्षेत्रभेटीच्या वेळी कोवीड सेंटर्समध्ये अशाप्रकारच्या तपासणीची व्यवस्था आहे अथवा नाही याची खातरजमा करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१८११३५०८९४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN,
S = Maharashtra, O = Government Of
Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.09.25 14:58:10 +05'30'

**(रो. दि. कदम पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त.(सर्व)
२. आयुक्त, महानगरपालिका .(सर्व)
३. जिल्हाधिकारी .(सर्व)
४. आयुक्त आरोग्य सेवा तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई .
५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
६. संचालक, आरोग्यसेवा मुंबई(नोडल ऑफिसर).

७. संचालक, आरोग्यसेवा पुणे.
८. उपसंचालक आरोग्य सेवा परिमंडळे .(सर्व)
९. वैद्यकीय आरोग्य अधिकारी, महानगरपालिका .(सर्व)
१०.जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
११.जिल्हा आरोग्य अधिकारी जिल्हा परिषद (सर्व)
१२.वैद्यकीय अधिक्षक, सामान्य रुग्णालये (सर्व)
१३.मुख्याधिकारी नगरपरिषद .(सर्व)
१४.निवडनस्ती (आरोग्य-३).